दिनांक १ जानेवारी, २००६ नंतरच्या निवृत्तीवेतनधारकांच्या निवृत्तीवेतनात / कुटूंबनिवृत्तीवेतनात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक : सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.दिनांक : २२ जून २००९

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १००८/प्र.क्र.९९/सेवा-४, दिनांक २७ ऑक्टोबर, २००८
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : वेपुर १२०९/प्र.क्र.२०/सेवा-९, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १००९/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक ५ मे, २००९.

## शासन निर्णय

केंद्र शासनाच्या सहाव्या केंद्रिय वेतन आयोगाच्या शिफारशीच्या आधारे राज्य शासकीय कर्मचाऱ्याच्या निवृत्तीवेतनामध्ये सुधारणा करण्यासाठी श्री. पी. एम. ए.हकीम यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ स्थापन केली होती. या समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने संदर्भाधिन (२) वरील शासन निर्णय दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ च्या आदेशान्वये निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनामध्ये सुधारणा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार शासनाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन ) नियम १९८२ मधील निवृत्तीवेतन, निवृत्ती/मृत्युउपदान आणि कुटुंब निवृत्तीवेतन नियमित करणाऱ्या तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ मधील नियमामध्ये खालीलप्रमाणे फेरबदल करण्याचा निर्णय घेतला असून हे फेरबदल शासकीय कर्मचारी तसेच उपरोल्लेखित नियम ज्यांना लागू आहेत अशा इतर कर्मचाऱ्यांना लागू राहतील.

**अंमलबजावणीचा दिनांक -**

२. **या आदेशान्वये सुधारित केलेल्या तरतूदी दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर निवृत्त होणाऱ्या /सेवेत असताना मृत्यु पावलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांना लागू होतील.** दिनांक १ जानेवारी, २००६ पूर्वी निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भात संदर्भाधिन (३) वरील शासन निर्णय दिनांक ५ मे, २००९ अन्वये स्वतंत्र आदेश काढण्यात आले आहेत.

३.	दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर निवृत्त/मृत झालेल्या/होणाऱ्या ज्या प्रकरणी निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन/उपदान/निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण यापूर्वीच प्राधिकृत करण्यात आले आहेत किंवा अद्यापि प्राधिकृत करावयाचे आहेत अशा प्रकरणी ते या आदेशानुसार सुधारित करण्यात येईल.

**वेतन -**

४.	निवृत्तीवेतन विषयक विविध लाभांच्या परिगणनेसाठी वेतन या संज्ञेचा अर्थ म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ९ (३६) (एक) मध्ये व्याख्या केल्यानुसार, शासकीय कर्मचाऱ्यास त्याच्या निवृत्तीपूर्वी मिळत असलेले मूळ वेतन असा राहील.

५.	सदरहू आदेशामध्ये वेतन या संज्ञेचा अर्थ म.ना.से. (सुधारित वेतन) नियम २००९ प्रमाणे अंमलात आलेल्या सुधारित वेतनश्रेणीतील वेतन असा राहील.

**निवृत्तीवेतन -**

६.	दिनांक १.१.२००६ पासून सर्वच प्रकरणी अर्हताकारी सेवेचा किमान कालावधी २० वर्षे इतका राहिल. त्यामुळे अर्हताकारी सेवेत भर घालण्याची तरतुद दि.१.१.२००६ पासून रद्द करण्यात येत आहे. या अनुषंगाने म.ना.से. (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (ए) सुधारण्यात आला आहे. २० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण केल्यानंतर नियतवयोमानानुसार/ स्वेच्छा सेवानिवृत्ती घेऊन सेवानिवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्तीच्या शेवटच्या १० महिन्यात अर्जित केलेल्या सरासरी मूळ वेतनाच्या किंवा शेवटच्या महिन्यात घेतलेल्या मूळ वेतनाच्या ५०% यापैकी जी रक्कम कर्मचाऱ्यास लाभदायक ठरेल, ती रक्कम निवृत्तीवेतन म्हणून अनुज्ञेय होईल. त्यामुळे दि.१.१.२००६ नंतर सेवानिवृत्त झालेल्या ज्या निवृत्तीवेतनधारकांचे निवृत्तीवेतन त्यांच्या अर्हताकारी सेवेत भर घालून निश्चित करण्यात आले आहे, त्या निवृत्तीवेतनधारकांचे निवृत्तीवेतनही या सुत्रानुसारच निश्चित करण्यात यावे. तथापि जेथे निवृत्तीवेतनधारक त्याला नियतवयोमान/निवृत्तीच्या दिनांकाला आवश्यक असलेली २० वर्षाची कमाल अर्हताकारी सेवा पूर्ण करीत नसेल तेथे कमी सेवेच्या प्रमाणात यथायोग्य असे निवृत्तीवेतन कमी करण्यात येईल.

**निवृत्ती उपदान/मृत्यु उपदान -**

७.	महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ९ (३६) (एक) मध्ये व्याख्या केल्यानुसार मूळ वेतनावर निवृत्ती/मृत्यु उपदानाची परिगणना करण्यात येईल. उपदानाची कमाल मर्यादा वेतनाच्या साडेसोळा पट किंवा पाच लाख यापैकी जी कमी असेल ती राहील.

**कुटुंब निवृत्तीवेतन १९६४**

८. कुटुंब निवृत्तीवेतनाची परिगणना मूळ वेतनाच्या ३० टक्के अशा एकरुप दराने काढण्यात येईल. सेवेत असलेल्या ज्या कर्मचा-याचा मृत्यु दि.१.१.२००६ नंतर झाला असेल/होईल, अशा कर्मचा-यांच्या वारसांना १० वर्षापर्यंत उच्च दराने निवृत्तीवेतन मिळेल. या अनुषंगाने म.ना.से. (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील संबंधित नियम सुधारण्यात आला आहे.

**निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण -**

९. म.ना.से. (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ मधील नियम ५ (१) नुसार निवृत्तीवेतनधारकाने दिनांक १.१.२००६ पासून निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण करण्याचा विकल्प दिल्यास त्याला निवृत्तीवेतनाच्या किमान ४०% व त्यापेक्षा अधिक होणार नाही एवढया भागाचे एका ठोक रकमेतील प्रदानासाठी सुधारित दराने अंशराशीकरण करता येईल. त्यामुळे दिनांक १.१.२००६ पासून सेवानिवृत्त झालेल्या/मृत पावलेल्या व अंशराशीकृत मुल्य घेतलेल्या निवृत्तीवेतनधारकांचे या सूत्रानुसार पुन्हा अंशराशीकृत मुल्य काढण्यात यावे. अर्जदारास देय होणाऱ्या ठोक रकमेची गणना सुधारित तक्त्यानुसार करण्यात यावी. अशा प्रकारे परिगणित करण्यात आलेली रक्कम पूर्वी प्राप्त झालेल्या ठोक रकमेपेक्षा कमी आली तर अतिप्रदान रकमेची वसुली थकबाकीच्या रकमेतुन समायोजित करण्यात यावी. सुधारित तक्ता जोडपत्र-१ मध्ये देण्यात आला आहे. या अनुषंगाने म.ना.से. (निवृत्तिवेतन अंशराशीकरण) नियम १९८४ मधील तक्ता सुधारण्यात आला आहे.

**महागाई वाढ**

१०. या आदेशानुसार अनुज्ञेय होणा-या निवृत्तीवेतनावर दि.१.१.२००६ नंतरची महागाई वाढ सुधारित पध्दतीनुसार खालीलप्रमाणे दिली जाईल.

| अनु. क्र. | कालावधी | महागाई वाढीचा मासिक दर |
|---|---|---|
| १ | १ जानेवारी २००६ पासून | ० |
| २ | १ जुलै २००६ पासून | २% |
| ३ | १ जानेवारी २००७ पासून | ६% |
| ४ | १ जुलै २००७ पासून | ९% |
| ५ | १ जानेवारी २००८पासून | १२% |
| ६ | १ जुलै २००८ पासून | १६% |

११. निवृत्तिवेतनधारक/कुटुंब निवृत्ती वेतनधारकांच्या निवृत्तिवेतन/कुटुंब निवृत्ती वेतनात दि. १/१/२००६ पासून सुधारणा करण्यात यावी. मात्र सुधारीत वेतन संरचनेत निवृत्तिवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाचा प्रत्यक्ष लाभ दि. १/४/२००९ पासून अदा करण्यात यावा. त्यापूर्वीच्या थकबाकीच्या रकमेतून अंशराशीकरणाच्या सुधारित पध्दतीमुळे जादा प्रदानाची वसुली व शासन निर्णय, वित्त विभाग क्र. सेनिवे १००८/प्र.क्र.९९/सेवा-४, दि. २७ ऑक्टोबर २००८ अन्वये मंजूर केलेल्या अग्रिमाची रक्कम दि. १/१/२००६ ते दि. ३१/३/२००९ या कालावधीत अनुज्ञेय थकबाकीच्या सुरुवातीच्या वर्षात समायोजित करण्यात यावी. उर्वरित थकबाकीची रक्कम पुढील पाच वर्षात समान हप्त्यात रोखीने अदा करण्यात यावी.

१२. **दिनांक १.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर निवृत्त झालेल्या होणा-या/सेवेत असताना मृत्यु पावलेल्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत निवृत्तिवेतनविषयक लाभांचे निर्धारण व प्राधिकृती याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ मध्ये विहित केलेली नेहमीची कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.**

१३. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषित्तरे विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय, योग्य त्या फेरफारासह लागू राहतील.

१४. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ **मधील यासंबंधीच्या विद्यमान तरतुदींमध्ये स्वतंत्रपणे सुधारणा करण्यात येत आहे.** महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ आणि महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ **मधील ज्या तरतुदींमध्ये या आदेशान्वये स्पष्टपणे सुधारणा करण्यात आलेल्या नाहीत त्या अबाधित राहतील.**

१५. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहतील.

१६. यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या निवृत्तिवेतनधारकांचे निवृत्तिवेतन ज्या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो त्या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तथापि, आवश्यक असल्यास संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी वरील

निवृत्तिवेतनधारकांसबंधीचा खर्च भागविण्यासाठी विधीमंडळाच्या येत्या अधिवेशनात पूरक मागणी सादर करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २००९०६२३१२३४२६००१ असा आहे.

१८. सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

निलेश बा. वाडेकर
शासनाचे उप सचिव

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१०० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४,
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१०० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे

Revision of Pension/Family Pension of post 2006 Pensioners/Family Pensioners.
.

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**

**FINANCE DEPARTMENT**

Resolution No.PEN 1009/C.R.33/SER-4

Mantralaya, Mumbai 400 032 dated 22nd June 2009

**Read :**1) Government Resolution, Finance Department, No.PEN 1008/CR 99/SER-4, dated 27th October, 2008

2) Government Resolution, Finance Department, No.Vepur 1209/CR 20/SER-9 dated 27th February, 2009

3) Government Resolution, Finance Department, No. PEN 1009/CR 29/SER-4, dated 5th May 2009

## Resolution

In view of the recommendations of sixth pay commission of Central Government, State Government has set up the State Pay Revision Committee,2008 under the Chairmanship of Shri.P.M.A.Hakim to revise the pension of State Government pensioners. As per the recommendation of the committee Govt. vide GR dated 27th Feb.2009 referred to above at sr.no.2 has decided to revise the pension/family pension of the pensioners/family pensioners. Accordingly, Government is pleased to introduce the following modifications in the rules regulating Pension, Retirement/Death Gratuity,and Family Pension under the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and commutation of pension under Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 which will apply to State Government employees and others governed by the above rules.

**Date of Effect :**

**2.** The revised provisions as per these orders shall apply to State Government servants who retire/die in harness on or after 1st January, 2006. Separate orders have been issued in respect of employees who retired before 1st January 2006 under Government Resolution GR dated 5th May 2009 referred to above at sr.no.3.

**3**. Where Pension/Family Pension/Gratuity/Commutation of Pension has already been authorised or yet to be authorised in cases of retirement/death occurring on or after 1st January 2006, the same shall be revised in terms of these orders.

**Pay :**

**4.** The term "Pay" for purposes of calculating various pensionary benefits shall mean basic pay as defined in Rule 9 (36)(i) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, which the Government servant was receiving immediately before his retirement or on the date of his death.

**5.** The term "Pay" in these orders means the pay in the revised scales promulgated under the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009.

**Pension :**

**6.** Minimum qualifying service will be 20 years from 1st January,2006 for all cases.Therefore the provision of addition to qualifying service is deleted from 1st January, 2006. Rule 66(A) relating to addition to qualifying service under the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, shall stand modified to this extent. After completing 20 years of qualifying service, a government servant who retires on superannuation/by Voluntary, pension shall be paid at 50 % of the emolument or average emoluments received during last 10 months, whichever is more beneficial to him. All pension/family pension cases after 1/1/2006 where pension has been fixed by adding years in qualifying service should be reviewed with above formula and according pension/family pension should be refixed. However, such pension will be suitably reduced pro-rata, where the pensioner has less than the required 20 years minimum qualifying service for pension as per rule 110 of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982,

**Retirement Gratuity/Death Gratuity :**

**7.** Retirement /Death Gratuity shall be calculated on the basic pay as defined in Rule 9 (36)(i) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982.The upper ceiling of maximum amount of gratuity i.e. 16 times of pay or Rs.Five Lakh, whichever is less.

**Family Pension, 1964 :**

**8.** Family Pension shall be calculated at a uniform rate of 30% of Basic pay in all cases. The enhanced family pension shall be payable to the family of a Government servant for a period of ten years from the date of death of the Government servant who dies while in service w.e.f.1st January,2006. Rule 116 (4) (a) (i) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, shall stand modified to this extent w.e.f. 1st January, 2006.

**Commutation of Pension :**

**9.** If a Government servant opts to commute his pension, as per Rule 5 (1) of the Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984, the amount of commutation should not be less than 40% and it should not exceed the limit of 40% w.e.f.1/1/2006. The

cases of pensioners who have retired/dead after 1/1/2006, and have already taken commutted value as per old rates, should be reviewed with revised value and rates from 1/1/2006. If the revised value is less than the lumpsum paid earlier than the recovery of excess amount should be adjusted from the arrears. The revised rates for commutted amount are given in Annex.I The existing table of Commutation value for Pension annexed to the Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 shall be substituted by a new table.

**Dearness Relief :**

**10**. The period and monthly rates of dearness relief on the Pension/Family Pension from 1st January, 2006 are as follows :

| Sr.No. | Period | Monthly rates of D.A. |
|---|---|---|
| 1 | From 1st January 2006 | 0 |
| 2 | From 1st July 2006 | 2% |
| 3 | From 1st January 2007 | 6% |
| 4 | From 1st July 2007 | 9% |
| 5 | From 1st January 2008 | 12% |
| 6 | From 1st July 2008 | 16% |

**11.** Pension should be revised from 1st January, 2006. But the pensioners will get revised pension from 1st April, 2009. The arrears due to revision (Pension/Family Pension, Commutation) with effect from 1st January, 2006 to 31st March, 2009 (both days inclusive) should be paid in cash in 5 equal installments over the next 5 years after adjusting the excess recovery due to commutation if any and the amount of advance sanctioned vide Government Resolution No.PEN 1008/CR 99/SER-4 dated 27/10/2008 in the first installment.

**12. In cases of State Government Servants who retire/die-in-harness on or after 1st January,2006, the usual procedure for determination and authorisation of pensionary benefits as laid down in the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 should be followed.**

**13.** Government is also pleased to direct that the above decision should, mutatis mutandis apply to those Pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities etc., to whom the pension scheme is made applicable.

14. Formal amendments to the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 in terms of the decisions contained in this order will be issued separately. Provisions of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 and Maharashtra Civil Services (Commutation of Pension) Rules, 1984 which are not specifically modified by these orders will remain unaffected.

15. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishadas and Panchayat Samiti's Act 1961 (Mah.V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decisions apply to the pensioners of Zilla Parishadas.

16. The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the Pensions of the Pensioners mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned thereunder. However, if necessary, concerned Administrative Departments of Mantralaya should take necessary steps to present Supplementary Demands in the ensuing session of the Legislature to cover expenditure to be incurred in respect of aforesaid Pensioners.

17. This Government Resolution is available on the web site of Government of Maharashtra i.e.-"**www.maharashtra.gov.in**" and its computer code number is **20090623123426001.**

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(N B Wadekar)

**Nilesh B. Wadekar**
**Deputy Secretary to Government**

**Annexure-I**

**COMMUTATION VALUE FOR A PENSION OF Re.1 PER ANNUM**

| Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase | Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase | Age next birthday | Commutation Value expressed as number of year's purchase |
|---|---|---|---|---|---|
| 20 | 9.19 | 41 | 9.075 | 62 | 8.093 |
| 21 | 9.187 | 42 | 9.059 | 63 | 7.982 |
| 22 | 9.186 | 43 | 9.040 | 64 | 7.862 |
| 23 | 9.185 | 44 | 9.019 | 65 | 7.731 |
| 24 | 9.184 | 45 | 8.996 | 66 | 7.591 |
| 25 | 9.183 | 46 | 8.971 | 67 | 7.431 |
| 26 | 9.182 | 47 | 8.943 | 68 | 7.262 |
| 27 | 9.180 | 48 | 8.913 | 69 | 7.083 |
| 28 | 9.178 | 49 | 8.881 | 70 | 6.897 |
| 29 | 9.176 | 50 | 8.846 | 71 | 6.703 |
| 30 | 9.173 | 51 | 8.808 | 72 | 6.502 |
| 31 | 9.169 | 52 | 8.708 | 73 | 6.296 |
| 32 | 9.164 | 53 | 8.724 | 74 | 6.085 |
| 33 | 9.159 | 54 | 8.678 | 75 | 5.872 |
| 34 | 9.152 | 55 | 8.627 | 76 | 5.057 |
| 35 | 9.145 | 56 | 8.572 | 77 | 5.443 |
| 36 | 9.136 | 57 | 8.512 | 78 | 5.229 |
| 37 | 9.126 | 58 | 8.446 | 79 | 5.018 |
| 38 | 9.116 | 59 | 8.371 | 80 | 4.812 |
| 39 | 9.103 | 60 | 8.287 | 81 | 4.611 |
| 40 | 9.090 | 61 | 8.194 | | |

**----------------------**